

PRATHAM BOOKS
A Book in Every Child's Hand

वाचन पातळी २

# काकूचं बाळ

**Author:** Madhuri Purandare
**Illustrator:** Madhuri Purandare



आईनं अनूला हाक मारली,
“अनू, ऊठ आता! किती झोपायचं ते!”
अनू म्हणाली, “ऊं, मी नाई...!”
आई म्हणाली, “मग मी एकटीच जाऊ काकूचं बाळ बघायला?”



अनू तटकन उठून बसली.
“बाळ! छोटुकलं? बाहुलीसारखं?
मी येणार!”



अनू पटापट तयार झाली.
अज्जिबात कटकट न करता तिनं दूध पिऊन टाकलं.
न रडता आईकडून वेण्यादेखील घालून घेतल्या.



काकूच्या घरात शिरता शिरताच अनू ओरडली,
“काकू! कुठंय बाळ?”
काकू तोंडावर बोट ठेवत म्हणाली, “शू:! हळू बोलायचं, बाळ झोपलंय.”
झोपलंय? हॅट् बाबा! अनू खट्टू झाली.



आई अनूला जवळ घेत म्हणाली,
“बाळ अजून खूप छोटं आहे, अनू. त्याला त्रास नाही द्यायचा, बरं का. तू ताई आहेस ना त्याची?”
ताई! अनूला खूप ऐट वाटली.
पण मी एवढी खेळायला आलेय आणि बाळ झोपलंय कशाला?



एवढ्यात बारीकसा पीं, पीं असा आवाज आला.
“उठला वाटतं,” काकू म्हणाली आणि तिनं बाळाला आईकडे दिलं.
अनू म्हणाली, “मीपण मांडीवर घेणार बाळाला!”
आई म्हणाली “नाही हं, अनू. तुला जमणार नाही. तू लहान आहेस.”
अनू कुरकुरली, “पण मी ताई आहे नं!”



आईनं बाळाला मांडीवर घेतलं. अनूला वाटलं, बाळालाच का म्हणून?
मलापण आईच्या मांडीवर बसायचंय. पण आई म्हणाली, “अनू , लांब हो बरं!
बाळाला त्रास नाही द्यायचा. छोटं आहे ना ते?”
अनूनं गाल फुगवले आणि ती दूर कोपऱ्यात जाऊन उभी राहिली.



बाळाचं पीं पीं चालूच होतं,
“अगंबाई, शी केली वाटतं!” काकू म्हणाली.
मग तिनं बाळाला स्वच्छ केलं, त्याची चड्डी बदलली.
बाळ खुदकन हसलं.



आता मात्र अनूला रागच आला.
ह्या बाळाला काहीच कळत नाही. चड्डीत शी करतं.
आणि आई आणि काकू तर अगदीच वेड्या आहेत.
बाळाला रागावतपण नाहीत.



मी चड्डीत नुसती शू केली तरी आई एवढे डोळे करते, ह्या बाळाला मात्र मांडीवर घेऊन बसते आणि ओलुलु, शोनुलु करत त्याचे लाड करते. घरी जाऊन मी बाबालाच सगळं सांगणार आहे.



अनू म्हणाली, “आई, मला घरी जायचंय. चल ना!”
काकू म्हणाली, “का गं ? बाळ आवडलं नाही का तुला?”
अनू म्हणाली, “च्यक्! वेडं बाळ.
चड्डीत शी करतं. बोलत नाही, खेळत नाही, मला नाही आवडलं तुझं बाळ.
असलं बाळ कशाला आणलंस तू?”



घरी परत जाताना अनूनं विचारलं,
“आई, मी बाळ कधी होणार?”

आई म्हणाली, “तू पुन्हा बाळ नाही होणार अनू. तू आता मोठी होणार.”

अनू म्हणाली, “मला नाही व्हायचं मोठी. मला बाळ व्हायचंय आणि तुझ्या मांडीवर झोपायचंय आणि चमच्यानी दुदू प्यायचंय आणि बाबाच्या कडेवर बसून भूर जायचंय...” घरी येईपर्यंत अनूची भुणभुण चालू होती.



दुसऱ्या दिवशी आई अनूला म्हणाली, “अनू, तुझे छोटे कपडे, खेळ आणि पाळणा आपण जुईकाकूच्या बाळाला देऊन टाकू या, काय!”




अनू ओरडली, “ए नाही गं! माझाय तो चेंडू. आणि पाळणापण!”
आई म्हणाली, “बरं. मग हे कपडे देऊ ना? छोटे आहेत....”
अनू पुन्हा ओरडली, “असू देत. मला घालायचेत, आत्ता!”
मग आईनं अनूला छोटं झबलं घातलं आणि डोक्यावर टोपडंही घातलं.





अनू रांगत रांगत घरभर फिरली.
चेंडू डोक्यावर घेऊन तिनं दही घ्या, दही केलं.
ती खुळखुळ्याशी खेळली.



मग अनू पाळण्यात चढून बसली.
तिला हाताचा अंगठा चोखत पाळण्यात झोपायचं होतं, पण झोपताच येईना.
इकडून पाय बाहेर यायला लागले, तिकडून हात सरळ होईना.
घट्ट झालेलं झबलं टोचायला लागलं. हॅट्! काही मजाच नाही.



अनूला कंटाळा आला.
अनू आईला म्हणाली, “आई गं, आपण हा फ्रॉक आणि टोपडं आणि पाळणा काकूच्या बाळाला देऊ या का?”

आई म्हणाली, “देऊन टाकायचं? पण मग तू काय घालणार? आणि झोपणार कुठे?”
अनू म्हणाली, “अगं, मी आता ताई झाले आहे की नाही? ताई झाल्यावर दुसरे कपडे घालायचे असतात आणि पलंगावर झोपायचं असतं.”
“हो का? हे नव्हतं बाई माझ्या लक्षात आलं,” आई म्हणाली.

अनूनं दुसरे कपडे घातले. ती आईला म्हणाली, “हे सगळं बाळाला दे आणि ताईनी दिलंय असं सांग. सांगशील ना?”

असं म्हणून अनूनं आपली स्कूटर घेतली आणि ती भुर्रर्रकन खेळायला निघून गेली.

storyweaver PRATHAM BOOKS



## Story Attribution:

This story: काकूचं बाळ is written by Madhuri Purandare . © Pratham Books , 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Other Credits:

This book has been published on StoryWeaver by Pratham Books. Pratham Books is a not-for-profit organization that publishes books in multiple Indian languages to promote reading among children. www.prathambooks.org

## Illustration Attributions:

Cover page: Faces around a baby in a cot, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: Girl sleeping on the bed, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Girl sitting up on the bed, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Lady combing girl's hair, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Girl talking to a lady with a baby on her lap by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Lady holding girl close and talking to her, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: Girl and lady looking at a baby in another lady's lap by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: Lady holding a baby in her lap and speaking to a little girl by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 9: Two ladies changing a baby's nappy, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 10: Girl looking sulky, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 11: Sulky girl, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Illustration Attributions:

Page 12: Girl talking to two ladies with a baby on one's lap, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 13: Girl and lady in saree talking, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 14: Girl and lady looking at toys and clothes, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 15: Girl holding a ball and wearing a frock and bonnet, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 16: Girl wearing a frock, bonnet and playing with toys, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 17: Girl sitting on cradle and sucking her thumb, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 18: Girl on scootie talking to her mother, by Madhuri Purandare © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.





# काकूचं बाळ

(Marathi)

अनू अगदी उत्साहानं काकूचं बाळ बघायला जाते. आई आणि काकू मात्र सारखं त्याचंच कौतुक करतात. अनूला ते मुळीच आवडत नाही.

या पुस्तकाची वाचन पातळी २ आहे. ओळखीचे शब्द जाणून वाचणाऱ्या आणि मदत घेऊन नवे शब्द वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.




Pratham Books goes digital to weave a whole new chapter in the realm of multilingual children's stories. Knitting together children, authors, illustrators and publishers. Folding in teachers, and translators. To create a rich fabric of openly licensed multilingual stories for the children of India  and the world. Our unique online platform, StoryWeaver, is a playground where children, parents, teachers and librarians can get creative. Come, start weaving today, and help us get a book in every child's hand!